मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे स्त्री
बंदयांसाठी दुमजली इमारत बांधण्यास
प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- बांधका-०१२०/४/प्र.क्र.१०२/पीआरएस-२.**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ९ नोव्हेंबर, २००१.**

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बीएलडी/१५९७
१६४०/कक्ष-३,दिनांक ९.११.२०००.

३) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम
दिनांक १०.७.२००१.

**शासन निर्णय:-** मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे स्त्री बंदयांसाठी दुमजली इमारत बांधण्यास येणाऱ्या रु.८५,२५,२६१/- च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी कारागृह महानिरीक्षक यांनी प्रस्ताव शासनास सादर केला असून त्यास प्रशासकीय मान्यता दयावी अशी शासनास विनंती केली आहे. प्रस्तावाच्या समर्थनार्थ कारागृह महानिरीक्षक यांनी असे नमूद केले आहे की मुंबई मध्यवर्ती कारागृह येथील स्त्री विभागामध्ये २३ स्त्री बंदयांची अधीकृत क्षमता आहे.परंतु तेथे सध्या १५० स्त्री बंदी ठेवावे लागतात.त्यामुळे बराकी मध्ये गर्दी होत असून स्त्री बंदयांना झोपण्यासाठी पूरेशी जागा उपलब्ध होत नाही.सध्या तेथे असलेला स्त्री वार्ड पाडून त्या ठिकाणी दुमजली इमारत बांधणे आवश्यक आहे.

२. मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे स्त्री बंदयांसाठी दुमजली इमारत बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास सादर केलेला प्रस्ताव काही काळ शासनाच्या विचाराधीन होता.त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन शासन वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन व वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक-.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम दिनांक ११.७.२००१मधील अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७(२) (अ) व स्तंभ क्र.६ मधील अटींच्या अधीन राहून सदर शासन निर्णयाद्वारे मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तिय अधिकाराच्या अधिनतेने शासन या आदेशाद्वारे मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे स्त्री बंदयांसाठी दुमजली इमारत बांधण्यास येणाऱ्या रु.८५,२५,२६१/-(रु.पंच्याऐंशी लक्ष पंचवीस हजार दोनशे एकसष्ट फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास (वित्तिय मान्यता धरुन) प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "मुख्यलेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१-बांधकामे,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (तुरुंग)" मागणी क्रमांक-एच-१३ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग,नियोजन विभाग यांच्या संमतीने व वित्त विभागाच्या दिनांक.११.७.२००१ च्या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या वित्तिय शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु.म.माने )

**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,दक्षिण विभाग,भायखळा,मुंबई.
अधिक्षक,मुंबई मध्यवर्ती कारागृह,मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
नियोजन विभाग (का.१४११) मंत्रालय,मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा.२) मंत्रालय,मुंबई.
अवर सचिव,गृह विभाग,बीयुडी-१,मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती /पीआरएस-२.